**महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मार्फत पुरवठा करण्यात येणाऱ्या वस्तूंच्या प्रलंबित देयकांच्या अदायगीच्या विलंबापोटी केंद्र शासनाच्या सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम विकास अधिनियम २००६ (Micro, Small & Medium Enterprises Development (MSMED) Act 2006) अंतर्गत महामंडळामार्फत देय व्याजाच्या दायित्वबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. लविम-२०२१/प्र.क्र.९९/उद्योग ६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २९ सप्टेंबर, २०२१.

**वाचा -**

(१) शासन निर्णय भाखस-१०९३(२७२७)/ उद्योग ६ दिनांक. ०६.०८.१९९७
(२) केंद्र शासनाचा सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम विकास अधिनियम २००६ (Micro, Small & Medium Enterprises Development (MSMED) Act 2006)
(३) महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्या, मुंबई यांचे दि.१६.९.२०२१ रोजीचे पत्र.
(४) उद्योग संचालनालय, मुंबई यांचे दि.२० सप्टेंबर,२०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ (मलउविम) हा महाराष्ट्र शासनाचा अंगीकृत उपक्रम आहे. मलउविम हे राज्यातील लघुउद्योग घटकांना सुविधा पुरविण्यासाठी विविध योजना राबविते. यामध्ये महामंडळामार्फत लघुउद्योग घटकांसाठी राबविण्यात येणाऱ्या विपणन सहाय्य योजनेचा समावेश आहे. या योजनेअंतर्गत महामंडळ लघुउद्योग घटकांच्या वतीने विविध शासकीय विभागांच्या खरेदी निविदेत भाग घेवून लघुउद्योग घटकांनी तयार केलेली त्यांची उत्पादने शासकीय विभागांना विक्री करण्यासाठी मदत करते. या योजनेअंतर्गत शासकीय विभागांकडून खरेदी आदेश प्राप्त झाल्यानंतर महामंडळ लघुउद्योग घटकांस पुरवठा आदेश देते. लघुउद्योग घटकांमार्फत महामंडळाच्या पुरवठा आदेशानुसार वस्तूंचा थेट पुरवठा संबंधित शासकीय विभागांस करण्यात येतो.

महामंडळामार्फत शासकीय विभाग, शासनाचे अंगीकृत उपक्रम व स्वायत्त् संस्थां यांनी प्रसिध्द केलेल्या निविदामध्ये निविदेचे निकष, अटी व शर्तीची पूर्तता करणाऱ्या आणि निविदेत भाग घेवू इच्छिणाऱ्या लघुउद्योग घटकांच्या वतीने भाग घेण्यात येतो. अशा निविदांमध्ये भाग घेताना खरेदीदार विभागास महामंडळाची भूमिका ही लघुउद्योग घटकांना सुविधा पुरविण्याची (Facilitator) असल्याचे तसेच निविदेतील वस्तूंच्या पुरवठयाचे आदेश महामंडळास प्राप्त झाल्यास या वस्तू पुरवठा करणाऱ्या लघुउद्योग घटक/ घटकाबाबत अवगत करण्यात येते. प्रत्यक्षात लघुउद्योग घटक महामंडळास वस्तूंचा पुरवठा न करता थेट शासकीय खरेदीदार (Buyer) विभागास करतात. लघुउद्योग घटक महामंडळाकडून पुरवठा आदेश स्वीकारताना/करारनामा करताना या पुरवठा आदेशातील अटी व शर्ती मान्य करतात ज्यामध्ये लघुउद्योग घटकांना त्यांच्या देयकाच्या रकमेची अदायगी संबंधित

शासकीय विभागाकडून पुरवठयापोटी रक्कम प्राप्त झाल्या नंतरच करण्यात येणार असल्याबाबतच्या अटीचा समावेश असतो. वस्तूंचा पुरवठा झाल्यानंतर संबंधित शासकीय विभागाकडून पुरवठा करण्यात आलेल्या वस्तूच्या देयकापोटी वस्तूंच्या किंमतीचे भुगतान महामंडळास करण्यात येते. संबंधित विभागाकडून वस्तूंच्या किंमतीचे भुगतान केल्यानंतर या प्राप्त रकमेतून महामंडळाचे सेवा शुल्क व संबंधित विभागाने कपात केलेल्या रकमा वजा करुन उर्वरित रक्कम महामंडळामार्फत संबंधित लघुउद्योग घटकास अदा करण्यात येते.

महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ हे पुरवठादार लघुउद्योग घटक आणि विविध शासकीय खरेदीदार (buyer) यांना एकत्र आणून सुविधा देणारा (Facilitator) म्हणून काम करते. त्यानुसार केंद्र शासनाच्या सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम विकास अधिनियम २००६ (Micro, Small & Medium Enterprises Development (MSMED) Act 2006) मधील विभाग क्र.२(n) व उपखंड (ii) मध्ये राज्याच्या लघुउद्योग विकास महामंडळाचा समावेश हा पुरवठादार (Supplier) च्या व्याख्येमध्ये केलेला आहे. राज्यातील लघुउद्योग घटकांना त्यांच्या वस्तूंच्या विपणनासाठी सुविधा पुरविताना लघुउद्योग घटकांमार्फत राज्यातील शासकीय विभाग, शासनाचे अंगीकृत उपक्रम व स्वायत्त् संस्था यांना पुरवठा करताना कोणत्याही टप्प्यावर महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ हे खरेदीदार संस्था (Buyer) म्हणून काम करीत नाही. यावरुन स्पष्ट होते की, (MSMED) Act 2006 मधील विभाग १५ व १६ मधील प्रलंबित देयकाच्या अदागीच्या विलंबाबाबत देय असलेल्या व्याजाबाबत महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ हे खरेदीदार (Buyer) संस्था म्हणून वर्गीकृत होत नाही. त्यामुळे संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णय अधिक्रमित करून सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधिन होती. याबाबत व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्या, मुंबई यांचे दि. १६.९.२०२१ रोजीचा प्रस्ताव व विकास आयुक्त, उद्योग संचालनालय, मुंबई यांचे दि.२०.९.२०२१ रोजीचे अभिप्राय पाहता खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यास शासन मान्यता देत आहे.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळामार्फत (MSSIDC) पुरवठा करण्यात आलेल्या वस्तूच्या लाभार्थी खरेदीदार (Buyer) हे शासकीय विभाग, शासनाचे अंगीकृत उपक्रम व स्वायत्त संस्था आहेत.

सबब, केंद्र शासनाच्या सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम विकास अधिनियम २००६ (MSMED Act 2006) मधील विभाग १५ व १६ मधील तरतूदीनुसार पुरवठा करणाऱ्या पुरवठाधारकास प्रलंबित देयकाच्या अदायगीच्या विलंबाबाबत व्याज देण्यास संबंधित खरेदीदार विभाग जबाबदार आहेत. महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ हे लघुउद्योग घटकाच्या वतीने सुविधा देणारा (Facilitator)

म्हणून काम करीत असल्यामुळे राज्यातील खरेदीदार शासकीय विभाग, शासनाच्या अंगीकृत उपक्रम व स्वायत्त संस्था यांना लघुउद्योग घटकांकडून पुरवठा करण्यात आलेल्या वस्तूंच्या/सेवांच्या प्रलंबित देयकांच्या भुगतानास झालेल्या विलंबापोटी व्याजाचे दायित्व केंद्र शासनाच्या सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम विकास अधिनियम २००६ (MSMED Act 2006) अंतर्गत महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळाचे राहणार नाही असे स्पष्ट करणेत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२१०९२९१५१९२०२११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासनाचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRY, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2021.09.29 15:19:15 +05'30'

**( संजय देगांवकर )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन ,मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई,
३) मा. उप मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. मंत्री, उद्योग विभाग महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा. राज्य मंत्री उद्योग विभाग महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) मा. विधानपरिषद/विधानसभा सर्व सदस्य,
८) प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई,
९) सहसचिव/उपसचिव, उद्योग विभाग, मंत्रालय ,मुंबई,
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्या, मुंबई.
११) विकास आयुक्त, उद्योग संचालनालय, मुंबई.
१२) मुख्य् कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१३) सर्व जिल्हापरिषद, महाराष्ट्र .
१४) सर्व स्वायत्त संस्था, महाराष्ट्र .
१५) सर्व मंत्रालयीन विभाग.
१६) निवडनस्ती (उद्योग - ६).